# एडगर डॉल्फिनच्या करामती

नथानिएल बेंचली

मराठी : अश्विनी बर्वे



# एडगर डॉल्फिनच्या करामती

नथानिएल बेंचली

चित्र : ममोरू फुनई

मराठी : अश्विनी बर्वे





एडगर डॉल्फिन अजून तरुण होता. पण तो खूप हुशार होता. जेव्हा तो छोटा होता तेव्हापासून तो वस्तू आपल्या तोंडात पकडू शकत होता आणि कधी-कधी त्या फेकू शकत होता.

जेव्हा आईने त्याला उडी मारायला शिकवले. तेव्हा त्याने अगदी आईसारखीच उडी मारली पण एवढी उंच नाही.







आईने एकदा त्याला एका जहाजाचा पाठलाग करायला शिकवले. एडगरने आपल्या तोंडात समुद्री शेवाळयाचा लांब तुका पकडला आणि मग जहाजाचा पाठलाग केला.

आईने त्याला हवेत सरळ उडी मारायला शिकवले. थोड्यावेळाने एडगर खाली येण्याची योग्य पद्धत शिकला. सुरुवातीला त्याला जखमा झाल्या, पण तो सतत प्रयत्न करत राहिला.



एक दिवस तो सरळ उडी मारण्याचा अभ्यास करत होता. तेव्हा त्याला दूरवर एक अजब दिसणारे जहाज दिसलं. “ठीक आहे, तुम्हांला माहित आहे?” तो म्हणाला. “मला ते जहाज खूप चित्ताकर्षक वाटत आहे. मी ते जवळ जाऊन बघणार.”





“त्याच्या खूप जवळ जाऊ नको,” एडगरची आई म्हणाली. “आपल्याला माहीत नाही ते काय आहे ते.”
“मला माहीत आहे मी काय करतो आहे ते.” एडगर म्हणाला..
मग तो तिथं गेला. त्याने जवळ जाऊन बघितलं तेव्हा जहाज थांबलं होतं. त्याच्यात मजेदार दिसणाऱ्या काही गोष्टी होत्या ज्या पाण्यात उड्या मारत होत्या.



“ते काय आहे?” एडगरने आश्चर्याने विचारले.

“मला तर ते मासे आहेत असं वाटत नाही.”

मग तो अजून थोडा जवळ गेला. अचानक त्याच्या समोर एक गोष्ट आली. त्याचा चेहरा गोल होता. त्याच्या चपट्या फ्लिपर्स होत्या आणि तो काळा होता.

“माझं नाव एडगर आहे.” एडगर म्हणाला. “तू कोण आहेस?” पण त्या गोष्टीने फक्त बुडबुडे काढले.

"माफ़ कर?" एडगर म्हणाला.

"बॉबब्लबीब्लबब्बल कोण?"

पण त्या वस्तूने फक्त अजून बुडबुडे तयार केले.

“मी हवेत सरळ उंच उडी मारू शकतो,”

एडगर म्हणाला.

“तुला मला भेटायला आवडेल?”



पण त्याने उडी मारण्याआधी ,त्याच्या जवळ अजून काही वस्तू आल्या.त्या त्याच्या चारी बाजूला आल्या.

त्यांच्यापैकी एकाजवळ जाळं होतं.

"अरे!" एडगर म्हणाला.

“हा कोणता खेळ आहे?”

पण कोणीच काही उत्तर दिले नाही.



त्याच्या चारीबाजूला जाळं पसरलं होतं. मग एडगरला पाण्याच्या बाहेर उडवलं गेलं. “जाळं कापा.” एडगर ओरडला. “मला जाऊ द्या.”



पण जाळं हवेत उचललं गेलं.आणि त्याला जहाजाच्या डेकवर ठेवलं गेलं. जाळं उचलणारी दोन माणसं हसत होती..





“ही काही मजा नाही,” एडगर रागात म्हणाला. “हा एक बेक्कार खेळ आहे, नाहीतर मग वाईट मस्करी आहे. मला माझ्या आईजवळ जायचं आहे.” पण माणसांनी त्याल उचलून एका टाकीत टाकलं.



टाकी मध्ये पाणी होतं. त्यामुळे एडगर ओला राहिला. पण टाकी खूप खोल नव्हती. “जर टाकीमध्ये अजून थोडं पाणी असतं.” त्याने विचार केला. “मग मी टाकीमधून बाहेर उडी मारू शकलो असतो.”

तो त्या लोकांकडे थोडं अधिक पाणी मागू शकला असता.पण ते लोक त्याला खूप हुशार वाटले नाही. “मला वाटतं त्यांना माझं म्हणणं कळणार नाही.”



त्याने पाणी मागण्याचा प्रयत्न केला, परंतु लोकांना त्याचं म्हणणं समजलं नाही. डॉल्फ़िन पकड़ल्या नंतर ते खूप खुश झाले होते.



“चला त्याला काही शिकवू या,”
त्यांच्यातल्या एका माणसाने म्हटलं.
“मी ऐकलं आहे की डॉल्फिन खूप स्मार्ट असतात.” त्या माणसाने एक चेंडू एडगर कडे फेकला.
“बघ,” तो म्हणाला. “जरा हे पकडण्याचा प्रयत्न कर.”



एडगरने सहज चेंडू पकडला
आणि तो परत फेकला.





"अरे बाप रे!" तो माणूस ओरडला.
“तो आपण विचार करू शकतो
त्यापेक्षा तो जास्त हुशार निघाला.”
“जर माझ्या टाकीत पाणी असतं
तर मी त्यांना अजून नवीन
करामती करून दाखवू शकलो
असतो,” एडगरने विचार केला.

त्याने एक माणूस पहिला जो पाण्याच्या नळीने डेकची सफाई करत होता. त्यामुळे एडगरच्या डोक्यात असा विचार आला. पण तो माणूस खूप दूर होता आणि एडगर त्या नळी पर्यंत पोहचू शकत नव्हता.



कोणीतरी एडगरकडे अजून एक चेंडू फेकला.

एडगरने तो परत फेकला. यावेळी त्याने चेंडू गोलाकार फिरवून फेकला. “त्याच्याकडे खूप क्षमता आहे!” तो माणूस ओरडला.





“आपल्याजवळ एक सुपर डॉल्फ़िन आहे!" प्रशंसा ऐकून एडगरला चांगलं वाटलं. पण आता एडगर त्या माणसांमुळे आणि त्यांच्या खेळामुळे थकून गेला होता.

एडगर विचार करू लागला की शेवटी ती माणसं त्याला कधी सोडून देतील? त्याला कधी जाऊ देतील? पण अचानक जहाज निघाले. मग एडगरला वाटलं की ते लोक त्याला जाऊ देणार नाहीत.



"अरे!" एडगर  म्हणाला. “मला
इथून जाऊ द्या!
मला घरी जायचं आहे.”
पण ते लोक फक्त हसत राहिले
आणि त्याला नवनवीन करामती
शिकवण्याचा विचार करू लागले.



एका माणसाने एडगरला एक अजब टोपी घालण्याचा प्रयत्न केला.पण एडगरने ती काढून टाकली. “त्याला हळूहळू टोपी आवडायला लागेल.” एक माणूस म्हणाला, “काळाबरोबर त्याला आपण काहीही आवडून घ्यायला शिकवू.”

“नाही, तुम्ही असं करू शकणार नाही!”एडगर ओरडला. “मी एक डॉल्फिन आहे, मी समुद्रात राहतो. मला माझ्या आईकडे परत जावं वाटतं आहे.”



“मला तो भुकेला वाटत आहे,”दुसरा माणूस म्हणाला.

“कोणीतरी त्याला मासे आणून द्या.” त्यांनी एडगरसाठी मासे आणले. पण त्यांनी मासे देण्याआधी एडगरला त्यांनी परत चेंडू फेकायला सांगितला.





एडगरला एवढा राग आला
त्याने चेंडू हवेत एवढ्या
जोरात फेकला की तो
जहाजाच्या किनाऱ्यावर पडला.





चेंडू समुद्रात जाऊन पडला.त्या लोकांना चेंडू घेण्यासाठी जहाज थांबवायला लागले. कोणीतरी जहाजातून उलटे टांगून घेवून चेंडू परत आणला. या गोष्टीमुळे एडगर विचारात पडला. या लोकांना चेंडू एवढा हवा आहे. म्हणजे तो त्यांच्यासाठी खूप महत्वाचा आहे.



“जर मी चेंडू पाण्याच्या नळीवाल्या माणसाकडे फेकला तर?.....

एडगरने त्या संधीची वाट पाहण्याचे ठरवले.

मग जेव्हा पण एडगर चेंडू फेके तेव्हा कोणीतरी माणूस चेंडू पकडायला उडी मारत असे. आता एडगर त्या लोकांना आपल्या इच्छेनुसार कुठेही उडी मारायला लावू शकत होता. डेकच्या खाली किंवा आपल्या टाकीत.



दुसऱ्या दिवशी तो माणूस एकटाच पाण्याच्या नळीने डेक धूत होता. तेव्हा एडगरने प्रयत्न करण्याचा निर्णय घेतला. एडगरने चेंडू आपल्या तोंडात दाबला. तेव्हा तो माणूस एडगरकडून चेंडू परत घेण्यासाठी आला.



त्याचवेळी एडगरने चेंडू डेकच्या खाली फेकला.मग त्याने सफाई कामगाराची नळी हिसकावून घेतले आणि ती आपल्या पाण्याच्या टाकीत टाकली.



त्या माणसाला तो खेळ खूप मजेशीर वाटला. आधी तो चेंडू घेण्यासाठी धावला. आणि मग तो दुसऱ्या लोकांना बातमी देण्यासाठी पळाला.



याकाळात एडगर
टाकीत पाणी भरत
राहिला.





जोपर्यंत बाकी लोक येत होते, तोपर्यंत टाकी पाण्याने भरून गेली आणि एडगर त्यात गोल-गोल पोहू लागला. तो अधिक जोरात, अजून जोरात पोहत राहिला. आणि मग त्याने सरळ हवेत उडी घेतली.



....आणि जहाजाचा किनारा पार करून... ....





..... सरळ आपल्या आईजवळ गेला.



समाप्त